**<u>सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेवून विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दांपत्यांसाठी " कन्यादान " योजना.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,**
शासन निर्णय क्रमांक :- साविसो २००३/प्र.क्र.७/सुधार-१,
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :-** २४ डिसेंबर, २००३

**प्रस्तावना** : महाराष्ट्रात अनुसूचित जाती (नवबौध्दासह), विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्गातील वेगवेगळया जाती जमातीतील लोकांचा आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक मागासलेपणा कमी करुन त्यांना समाजाच मुख्य प्रवाहात सामील करुन घेण्यासाठी महाराष्ट्र शासनातर्फे विविध योजना राबविण्यांत येत आहेत. या योजना राबवितांना सदर समाजात सामाजिक रुढी व परंपरेचा अजूनही पगडा असल्याचे जाणवते त्यामुळे विवाह सोहळयामध्ये अनाठायी खर्च करणे व त्यासाठी प्रसंगी कर्जबाजारी होणे व त्यामुळे आर्थिक समस्येच्या खाईत लोटले जाणे हे प्रकार अव्याहतपणे चालू असल्याचे निदर्शनास येते. सद्य:स्थितीत वेगवेगळ्या स्वयंसेवी संस्था या सर्व बाबी लक्षात घेवून समाजातील विविध घटकास सामुहिक विवाहास उद्युक्त करीत असतात. विवाहाचा हा खर्च कमी करणे व मागासवर्गीय कुटुंबांना या विवाहावर होणाऱ्या अनाठाई खर्चावर नियंत्रण आणणे गरजेचे आहे. त्यामुळे मागासवर्गीय सामुहिक विवाह सोहळ्याकडे आकर्षित व्हावेत आणि त्यासाठी विविध स्वयंसेवी संस्था पुढे याव्यात, तद्वतच, मागासवर्गीय कुटुंबांनाही त्यामध्ये उत्स्फूर्तपणे सहभागी होता यावे या उद्देशाने सामुहिक विवाह सोहळ्यात विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दांपत्यास आर्थिक सहाय्य करण्याची बाब शासनाच विचाराधीन होती. तद्नुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :- महाराष्ट्रात अनुसूचित जाती (नवबौध्दासह), विमुक्त जाती, भटक्या जमाती (धनगर व वंजारीसह), विशेष मागास प्रवर्गातील आर्थिकदृष्टया कमकुवत असलेल्या मागासवर्गीय कुटुंबातील सामुहिक विवाह सोहळयामध्ये सहभागी होऊन विवाह करणाऱ्या जोडप्यास एकूण रु.१०,०००/- (रुपये दहा हजार ) इतके अर्थसहाय्य देण्यात येईल. सदरचे अर्थसहाय्य खालील वस्तु स्वरुपात देण्यात येईल.

| | |
|---|---|
| १) मणी मंगळसूत्र (२३ कॅरटस् शुध्दता असलेले) | रु. ६०००/- |
| २) संसारोपयोगी साहित्य (भांडी वगैरे) | रु. ४०००/- |

(१) सदर योजना सन २००३-०४ या आर्थिक वर्षापासून राबविण्यात येईल. प्रतिवर्षी प्रत्येक जिल्हयात अनुसूचित जाती (नवबौध्दासह), विमुक्त जाती, भटक्या जमाती (धनगर व वंजारीसह), विशेष मागास प्रवर्गातील आर्थिकदृष्टया कमकुवत एकूण १०० जोडप्यांना या योजनेचा लाभ देण्यात येईल.

(२) प्रस्तुत " कन्यादान " योजनेअंतर्गत नवदांपत्यांना द्यावयाचे आर्थिक सहाय्य वितरीत करण्याची जबाबदारी संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यावर सोपविण्यात येत आहे.

(३) सेवाभावी संस्था / यंत्रणेने आयोजित केलेला सामुहिक विवाह सोहळयामध्ये केला जाणारा खर्च हा संस्थेने करावा. त्यासाठी कोणत्याही प्रकारचे अनुदान अनुज्ञेय राहणार नाही.

(४) स्वयंसेवी संस्था / यंत्रणेने सामुहिक विवाह सोहळयामध्ये सहभागी झालेल्या मागासवर्गीय जोडप्यांची परिशिष्ट-"अ" प्रमाणे माहिती, संबंधितांची छायाचित्रे, विहीत नमुन्यातील अर्ज इत्यादी कागदपत्रे विवाह संपन्न होण्याच्या किमान पंधरा दिवस अगोदर विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचेकडे सादर करावे लागतील. विवाह नोंदणी प्रमाणपत्र हे विवाहाच्या दिवशीच देण्यात यावे.

(५) प्रस्तुत योजनेअंतर्गत आर्थिक सहाय्यास पात्र होण्यासाठीचे निकष परिशिष्ट -" अ " प्रमाणे राहील.

(६) या योजनेअंतर्गत अर्थसहाय्य मिळणेसाठी संबंधितांनी परिशिष्ट -" ब " मध्ये दर्शविलेल्या नमुन्यात आपले अर्ज सादर करावेत.

(७) सदर खर्च खालील लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**" मागणी क्रमांक-एन-४, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातिचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०७) (०६) कन्यादान योजनेखाली नवदाम्पत्यांना अर्थसहाय्य (विघयो), (२२२५ ३५३ ८) योजनांतर्गत/दत्तमत "**

**" मागणी क्रमांक-एन-४, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०३-मागासवर्गीयांचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०४) कन्यादान योजनेखाली नवदाम्पत्यांना अर्थसहाय्य, (२२२५ ३५४ ७) योजनांतर्गत / दत्तमत "**

(८) सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ५९१/०३/व्यय-१४, दि. ७ जुलै, २००३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ना. ना. भडीकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
ºÉSÉÉ±ÉEò, ºÉ¨ÉÉVÉEò±ªÉÉhÉ, ¨É½É®É¹]Åõ ®ÉVªÉ, {ÉhÉ.
¨É½É±ÉJÉÉ{ÉÉ±É ¨É½É®É¹]Å-1/2, (±ÉJÉÉ ´É +xÉYÉªÉiÉÉ/ ±ÉJÉÉ ´É {É®ÉÒIÉÉ) ¨É¤É<
+ÊvÉnÉxÉ ´É ±ÉJÉÉ +ÊvÉEòÉ®ÉÒ, ¨É¤É<
ÊxÉ´ÉÉºÉÒ ±ÉJÉÉ {É®ÉÒIÉÉ +ÊvÉEòÉ®ÉÒ, ¨É¤É<
ºÉ´É ÊVÉ±½É EòÉ¹ÉÉMÉÉ®ú +ÊvÉEòÉ®ÉÒ
ºÉ´É Ê´É¦ÉÉMÉÒªÉ ºÉ¨ÉÉVÉEò±ªÉÉhÉ +ÊvÉEòÉ®ÉÒ
ºÉ´É Ê´É¶É¹É ÊVÉ±½É ºÉ¨ÉÉVÉEò±ªÉÉhÉ +ÊvÉEòÉ®ÉÒ
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
={É ºÉÊSÉ´É, ÊxÉªÉÉVÉxÉ Ê´É¦ÉÉMÉ (EòÉ.1431), ¨ÉjÉÉ±ÉªÉ, ¨É¤É<
={É ºÉÊSÉ´É, Ê´ÉkÉ Ê´É¦ÉÉMÉ (EòÉ-+lÉ-5/´ªÉªÉ-14),¨ÉjÉÉ±ÉªÉ, ¨É¤É<
सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सा.न्या.सां.का.क्री. व. वि.स.विभाग,मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (लेखाशाखा/अर्थसंकल्प), सा.न्या.सां.का.क्री.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई.
ÊxÉ´Éb xÉºiÉÒ-EòÉ.ºÉvÉÉ®ú-1

**शासन निर्णय क्रमांक:साविसो-२००३/प्र.क्र.७/सुधार-१, दिनांक २४-१२-२००३ चे परिशिष्ट-" अ "**

# परिशिष्ट - " अ "

## सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेवून विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दांपत्यास आर्थिक सहाय्य मिळण्यासाठी पात्रतेचे निकष

(१) वधू व वर हे महाराष्ट्र राज्याचे अधिवासी (domiciled) असले पाहिजे.

(२) नवदांपत्यातील वधू / वर यापैकी दोन्ही किंवा एक जण हे अनुसूचित जाती (नवबौध्दासह), विमुक्त जाती, भटक्या जमाती (धनगर व वंजारीसह), विशेष मागास प्रवर्गातील असावेत.

(३) दांपत्यापैकी वराचे वय २१ वर्षे व वधूचे वय १८ वर्षापेक्षा कमी असू नये.

(४) वधू-वर यांच्या प्रथम विवाहासाठीच हे अनुदान अनुज्ञेय असेल.

(५) बाल विवाह प्रतिबंध कायदा व हुंडा प्रतिबंध कायद्याअंतर्गत असलेल्या कोणत्याही कलमाचा भंग या दाम्पत्य / कुटुंब यांचेकडून झालेला नसावा, याबाबत लेखी प्रतिज्ञापत्र (Affidavit) सादर करणे आवश्यक आहे.

(६) जातीचे प्रमाणपत्र सक्षम प्राधिकृत अधिकाऱ्याने दिलेले असावे.

(७) आंतरजातीय विवाह असल्यास त्यासाठी शासन निर्णय क्र.युटीए-१०९९/प्र.क्र.४५/मावक-२, दिनांक ३० जानेवारी, १९९९ नुसार जे फायदे मिळतात तेही फायदे अनुज्ञेय राहतील.

## सामुहिक विवाह आयोजित करणाऱ्या स्वयंसेवी संस्था / यंत्रणेचे निकष

(१) स्वयंसेवी संस्था / यंत्रणा संस्था नोंदणी अधिनियम, १९६० व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १८५० अंतर्गत नोंदणीकृत असावी.

(२) सामुहिक विवाहासाठी कार्य करणारी स्वयंसेवी संस्था / यंत्रणा सेवाभावी असावी, व्यावसायिक नसावी.

(३) सेवाभावी संस्था / यंत्रणेने आयोजित केलेल्या सामुहिक विवाह सोहळयामध्ये केला जाणारा खर्च हा संस्थेने करावा. त्यासाठी संस्था पुरस्कर्ते शोधू शकेल. मात्र अशा कार्यक्रमासाठी कोणत्याही प्रकारचे शासकीय अनुदान अनुज्ञेय राहणार नाही.

(४) सामुहिक विवाह सोहळ्यासाठी किमान २० दाम्पत्ये (४० वर व वधू ) असणे आवश्यक राहील.

(५) सामुहिक विवाह सोहळा आयोजित करण्यासाठी क्षेत्रबंधन लागू होणार नाही.

# <u>परिशिष्ट - "ब "</u>

**सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेवून विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दाम्पत्यास आर्थिक मिळण्यासाठी संबंधित संस्थेने सादर करावयाच्या प्रस्तावाचा नमुना.**

## <u>नमुना</u>

संस्थेचे नांव व पत्ता :
दिनांक :

प्रति,
विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
-----------------------

विषय :- सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेवून विवाह करणाऱ्या मागासवर्गीय दाम्पत्यास आर्थिक सहाय्य या योजनेअंतर्गत आर्थिक सहाय्य मिळणेबाबत.

महोदय,

आमची संस्था स्वयंसेवी संस्था असून ती संस्था नोंदणी अधिनियम, १९६० / सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १८५० अन्वये नोंदणीकृत असून संस्थेचा नोंदणी क्रमांक --------------------------------- असा आहे. आमची संस्था ----------------------------------------- ठिकाणी कार्यरत आहे. या संस्थेने दिनांक ------------- रोजी ----------------- ठिकाणी --------------------- वाजता सामुहिक विवाह सोहळा आयोजित केलेला आहे. ह्या विवाह सोहळयात यासोबत नमूद तपशीलानुसार मागासवर्गीय वर / वधु सहभागी होऊन विवाह संपन्न होणार आहे. प्रस्तुत सामुहिक विवाहाकरिता येणारा खर्च आमची संस्था -----------------निधीतून करणार असून, वर / वधूचे विवाह नोंदणी विवाहाचे ठिकाणी होणार आहे. संबंधितांचे विवाहाबाबतचे नोंदणी प्रमाणपत्र विवाहाच्या दिवशीच देण्याची व्यवस्था करणेत येत आहे.

तरी उपरोक्त नमूद योजनेअंतर्गत देय असलेले अर्थसहाय्य (मणी, मंगळसूत्र व संसारोपयोगी साहित्य, भांडी वगैरे) मंजूर करुन त्याचा पुरवठा लग्न समारंभाचे दिवशी करणेबाबत विनंती आहे.

आपला विश्वासू,

( संस्था पदाधिकारी यांचे नांव व पद )

## सामुहिक विवाह सोहळा आयोजित करणाऱ्या संस्थेने आपल्या प्रस्तावा सोबत वर / वधू यांचेबाबत सादर करावयाचा तपशिल

### वराची माहिती

वराचा फोटो

(१) वराचे संपूर्ण नांव :-
(२) जन्मतारीख व वय :-
(३) धर्म :-
(अ) जात :-
(ब) पोट जात :-
(४) शिक्षण :-
(५) मूळ राहण्याचे ठिकाण :-
(अ) गांव :-
(ब) तालुका :-
(क) जिल्हा :-
(ड) दूरध्वनी (असल्यास) :-

### वधूची माहिती

वधूचा फोटो

(१) वधूचे संपूर्ण नांव :-
(२) जन्मतारीख व वय :-
(३) धर्म :-
(अ) जात :-
(ब) पोट जात :-
(४) शिक्षण :-
(५) मूळ राहण्याचे ठिकाण :-
(अ) गांव :-
(ब) तालुका :-
(क) जिल्हा :-

(६) टपालाचा संपूर्ण पत्ता :-

(७) दूरध्वनी (असल्यास)

(अ) निवास :-

(ब) कार्यालय :-

(क) इतर :-

## विवाह विषयक माहिती

(१) सामुहिक विवाह आयोजित करणाऱ्या संस्थेचे / यंत्रणेचे नांव :-

(२) सामुहिक विवाहाचे ठिकाण :-

(३) सामुहिक विवाह आयोजित केल्याची तारीख :-

(४) विवाह पध्दती :- वैदिक / नोंदणी

(५) प्रथम विवाह आहे काय ?

(अ) वर :- होय / नाही

(ब) वधू :- होय / नाही

(६) लग्नापूर्वी विधूर / विधवा, होता / होती काय ?

(अ) वर :- होय / नाही

(ब) वधू :- होय / नाही

(७) यापूर्वी सदर योजनेखाली अर्थसहाय्याची मागणी केली आहे काय ? :- होय / नाही

(८) अन्य जिल्ह्यामध्ये अशाप्रकारचा अर्ज केला आहे काय ? :- होय / नाही

आम्ही खाली स्वाक्षरी करणारे वर / वधू, सत्य प्रतिज्ञेवर लिहून देतो की, वर नमूद करण्यांत आलेली संपूर्ण माहिती आमचे ज्ञानानुसार खरी व वस्तु:स्थितीवर आधारित असून सदर माहिती खोटी अथवा वस्तु:स्थितीशी विसंगत असल्याचे निदर्शनास आल्यास होणाऱ्या कारवाईस आम्ही पूर्णतया जबाबदार राहू.

वराचे नांव व स्वाक्षरी वधूचे नांव व स्वाक्षरी

ठिकाण :

दिनांक :

**बाल विवाह प्रतिबंधक कायदा व हुंडा विरोधी कायद्याचा भंग न केल्याबाबत वर / वधू यांनी लिहून द्यावयाच्या प्रतिज्ञा पत्राचा नमुना (सदर प्रतिज्ञा पत्र रु. २०/- (अक्षरी रुपये वीस फक्त) चे स्टँम्प पेपरवर असावे.)**

-----------------------------------------------------------------------------------------------

समोर

नोटरी / सक्षम प्राधिकारी

**प्रतिज्ञापत्र लिहून देणार** :

(१) वराचे नांव :-
(अ) वय :-
(ब) व्यवसाय :-
(क) पूर्ण पत्ता :-

(२) वधूचे नांव :-
(अ) वय :-
(ब) व्यवसाय :-
(क) पूर्ण पत्ता :-

आम्ही उभयतांनी ------------------------------------------------------------------------- या संस्थेने दिनांक ----------------- रोजी ---------------------------------------------------------------- या ठिकाणी आयोजित केलेल्या सामुहिक विवाह सोहळ्यामध्ये सहभागी होऊन विवाह करण्याचे निश्चित केलेले आहे. आम्ही उभयता मागासवर्गीयांपैकी ------------------- समाजाचे असून आम्ही स्वखुशीने सदर विवाह सोहळ्यात सहभागी होत आहोत. आमचा विवाह आपसात संमतीने निश्चित झाला असून, आम्हांवर कोणाचे दडपण नाही. प्रस्तुत विवाह निश्चित करतांना आमच्याकडून अथवा आमच्या कुटुंबियांकडून बाल विवाह प्रतिबंधक कायदा / हुंडा विरोधी कायद्यातील तरतुदींचा भंग होणारे कोणतेही कृत्य घडलेले नाही अथवा भविष्यात घडणार नाही. सबब सामुहिक विवाहात सहभागी होणाऱ्या मागासवर्गीय दाम्पत्यांना अर्थसहाय्य योजनेअंतर्गत देय असलेले अर्थसहाय्य आम्हास मिळणेबाबत विनंती आहे.

वर नमूद तपशिल आमचे ज्ञानानुसार व माहितीनुसार खरा व वस्तु:स्थितीवर आधारित आहे. यात कोणत्याही प्रकारचा दोष अथवा दिशाभूल करणारी व वस्तु:स्थितीशी विसंगत अशी माहिती निदर्शनास आल्यास कायद्यातील तरतुदीनुसार आम्ही दंडात्मक कारवाईस वा अन्य शिक्षेस पात्र राहू. म्हणून प्रतिज्ञापत्र लिहून दिले.

वराचे नांव स्वाक्षरी

वधुचे नांव स्वाक्षरी

**समोर**
(स्वाक्षरी)
नोटरी / सक्षम प्राधिकारी
दिनांक :
ठिकाण :

**अर्जासोबत खालील कागदपत्रांच्या सत्यप्रती जोडाव्यात.**

(१) सक्षम प्राधिकृत अधिकाऱ्याने दिलेले वर व वधूचा (अथवा दोन्हीपैकी एक) जातीचा दाखला.

(२) बाल विवाह प्रतिबंध कायदा व हुंडा प्रतिबंध कायद्याअंतर्गत असलेल्या कोणत्याही कलमाचा भंग या दाम्पत्य / कुटुंब यांचकडून झालेला नसावा याबाबतचे विहीत नमुन्यातील प्रतिज्ञापत्र (Affidavit) सादर करणे आवश्यक आहे. (रुपये २०/- च्या स्टँम्प पेपरवर)

(३) जन्मतारखेचा पुरावा म्हणून शाळा सोडल्याच्या दाखल्याची प्रत.

(४) महाराष्ट्र राज्याचा अधिवासी असल्याचा पुरावा. (Domicile Certificate)